**मौजे साकरमाची, ता.आंबेगाव, जि.पुणे येथील पुनर्वसित कुटुंबाचे तात्पुरत्या निवाऱ्याची सोयीसाठी निधी वितरित करणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुनर्व-२०१८/प्र.क्र.११५/र-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: १९/०१/२०१९

वाचा -

१) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र.आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.१.८.२००९
२) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र.आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि.२८.३.२०११
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.एमएससी-२०११/प्र.क्र.१७८/फ-५, दि.३०.९.२०११
४) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७/०४/२०१५
५) शासन निर्णय, ग्रामविकास विभाग क्र.झेडपीए-२०१६/प्र.क्र.५६/वित्त-९, दि.७.१०.२०१७
६) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-२२(६)/योजना/प्र.क्र.५२/१७-१८/२०६६, दि.२०.११.२०१७
७) उप वनसंरक्षक, ठाणे वनविभाग, ठाणे यांचे पत्र क्र.कक्ष-१/जमीन-२/पुनर्वसन २३५१/ सन २०१७-१८, दि.२०.३.२०१८
८) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष-२२(६)/योजना/ प्र.क्र.१३४/३३७१/१८-१९, दि.२६.१२.२०१८

प्रस्तावना -

भीमाशंकर अभयारण्यामुळे बाधित मौजे साकरमाचीवाडी व मौजे आहुपे (ता.आंबेगाव, जि.पुणे) येथे ४६ कुटुंबांपैकी २० कुटुंबांचे तात्पुरत्या निवाऱ्याची कुठेही व्यवस्था झालेली नाही. तात्पुरत्या निवाऱ्यासाठी शासकीय जमीन उपलब्ध न झाल्याने श्री.शंकर नारायण देसले, रा.साजई, ता.मुरबाड, जि.ठाणे यांच्याशी करार करुन त्यांच्या मालकीचा सर्वे नं.३८ मध्ये मौजे साकरमाचीवाडी येथील २० कुटुंबांचे तात्पुरते निवाऱ्याच्या बांधकामासाठी ना-हरकत प्रमाणपत्र दिले. सदर जागेवर साकरमाचीवाडी येथील २० कुटुंबांचे तात्पुरते निवाऱ्याची सोय करण्याचे ठरले. पुणे जिल्ह्यातील ३ वर्षापूर्वी माळीन येथे झालेल्या भुस्खलनाच्या दुर्घटनेसारखी घटना पुन्हा घडू नये म्हणून सदर बाधित कुटुंबांची तात्पुरते निवारा व्यवस्था तातडीने करणे अत्यंत आवश्यक झाले होते. संदर्भ क्र.६ अन्वये प्रदान अधिकारांतर्गत, उप अभियंता, जिल्हा परिषद (पाणी पुरवठा), मुरबाड यांनी सदर २० कुटुंबासाठी तात्पुरते निवारा शेड व २ स्वच्छता गृहांना अशा २२ कामांच्या अंदाजपत्रकांना तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे. संदर्भ क्र.३ अन्वये प्रदान केलेल्या अधिकारांतर्गत, उप वनसंरक्षक, ठाणे वन विभाग, ठाणे यांनी उपरोक्त कामांच्या २२ अंदाजपत्रकांना रुपये ४३,८२,९७४/- इतक्या रकमेची प्रशासकीय मान्यता प्रदान केली आहे. संदर्भ क्र.८ अन्वये, मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि.१९.९.२०१७ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त निर्गमित करण्यात आले असून, त्याअन्वये, उपरोक्त कामांना निधी मदत व पुनर्वसन विभागाने वितरित करण्याबाबत निर्देश प्राप्त झाले आहे. सदर निर्देशानुसार, उपरोक्त कामांना निधी विशेष बाब म्हणून वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

तदनुषंगाने, भीमाशंकर अभयारण्यामुळे बाधित मौजे साकरमाचीवाडी, ता.आंबेगांव, जि.पुणे येथे प्रकल्पग्रस्त कुटुंबांसाठी २० तात्पुरते निवारे व २ स्वच्छता गृहे या कामांसाठी मागणी करण्यात आलेला एकूण रू.४३,८२,९७४/- लक्ष निधी सन २०१८-१९ या चालू वित्तीय वर्षात खर्च करण्यास खालील अटीच्या अधीन राहून विशेष बाब म्हणून शासन मंजूरी देण्यात येत आहे.

**२. तदनुसार, शासन निर्णय वित्त विभाग क्र. विअप्र.२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र.२७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार, भीमाशंकर अभयारण्यामुळे बाधित मौजे साकरमाचीवाडी, ता.आंबेगांव, जि.पुणे येथे प्रकल्पग्रस्त कुटुंबांसाठी २० तात्पुरते निवारे व २ स्वच्छता गृहे या कामांची देयके अदा करण्यासाठी योजनेंतर्गत सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षात BEAMS प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून रु.४३,८२,९७४/- (रुपये त्रेचाळीस लक्ष ब्याऐंशी हजार नऊशे चौऱ्याहत्तर फक्त) एवढा निधी "मागणी क्रमांक सी, १०-४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत)" या लेखाशीर्षाखाली प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना खालील अटींच्या अधिन राहून उपलब्ध करुन देण्यात येत आहे.**

**वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी खालील सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.**

१) प्रधान मुख्य वनसरंक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी त्यांना या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित नियंत्रण अधिकारी म्हणून संबंधित उप वनसरंक्षक, ठाणे वनविभाग, ठाणे यांचेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMS द्वारे तात्काळ वितरित करावा.

२) उप वनसरंक्षक, ठाणे वनविभाग, ठाणे यांनी या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच उपरोक्त कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत, तदनुषंगाने कार्यपूर्ती अहवाल शासन, प्रधान मुख्य वनसरंक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना सत्वर सादर करावा.

३) या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेला व प्राप्त झालेला निधी मंजूर कामांवरच खर्च करण्यात यावा तसेच सदर निधी खर्च करताना मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा कोणत्याही परिस्थितीत जास्त खर्च होणार नाही तसेच मंजूर निधी शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची उप वनसंरक्षक, ठाणे वनविभाग, ठाणे यांनी दक्षता घ्यावी.

४) सदरच्या आदेशातील नमूद मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र.सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प,५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (योजनांतर्गत) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक रहाणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित उप वनसंरक्षक यांनी दक्षता घ्यावी.

५) मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र. सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियंत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

६) यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधीसंबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconcillation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

७) संबंधित उप वनसंरक्षक यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र Utilisation Certificate महालेखापाल कार्यालय, संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावीत.

८) यासंदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०१८-२०१९ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत शासनास सादर करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११९१२०१३८५८१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dayanand S Munjale

Digitally signed by Dayanand S Munjale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=831ad18b348f1d88937e4f113316b4ad736a2c6a66b967f985fda6404a710d52, cn=Dayanand S Munjale
Date: 2019.01.19 12:07:34 +05'30'

(द.शं.मुंजाळे)
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
२. मुख्य वनसंरक्षक (प्रा.), ठाणे वनवृत्त, ठाणे
३. उप वनसंरक्षक, ठाणे वनविभाग, ठाणे.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
५. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई-१, नागपूर-२ (२ प्रतीत)
६. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/ ठाणे.
७. सचिव (वने) यांचे स्वीय सहाय्यक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. वित्त विभाग, कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३, मंत्रालय, मुंबई-३२
९. नियोजन विभाग, कार्यासन १४७५, मंत्रालय, मुंबई ३२.
१०. महसूल व वन विभाग, कक्ष अधिकारी ब-१, मंत्रालय, मुंबई ३२.
११. महसूल व वन विभाग, पी.ए.सी. कार्यासन, मंत्रालय, मुंबई ३२.
१२. निवडनस्ती र-८, कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

* * *